राज्यातील ३१ कृषि उत्पन्न बाजार समित्यांच्या बाजार आवारात धान्य चाळणी प्रकल्प उभारणी प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यासाठी कलम १२(१) ची सर्वसमावेशक मंजुरी (Blanket Permission) देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृपमं१११७ /प्र.क्र.२१२/२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १९ डिसेंबर, २०१८

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृपमं१११७ /प्र.क्र.२१२ /२१-स दि.०४.०९.२०१८.
२) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ यांचे कृपमं/ अभि/ राकृवियो/ धान्यचाळणी/२६३८/२०१८ दि.१३.११.२०१८ चे पत्र
३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ यांचे कृपमं/अभि/राकृवियो/ धान्यचाळणी/२८७४/२०१८ दि.११.१२.२०१८ चे पत्र

प्रस्तावना :-

राज्यातील ३१ बाजार समित्यांमध्ये प्रत्येकी ०१ या प्रमाणे नवीन ३१ धान्य चाळणी यंत्र उभारणी कामाची अंमलबजावणी करण्यासाठी दि.०४.०९.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिली आहे. सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीचे स्वरुप व्यापक स्वरुपाचे असल्याने तसेच प्रत्येक बाजार समितीकरीता स्वतंत्र कलम १२(१) चे मंजूरीचा प्रस्ताव तयार करुन पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे सादर करणे याकरीता मोठा कालावधी लागणार असल्याने प्रकल्पांअंतर्गत समाविष्ट ३१ बाजार समित्यांना धान्य चाळणी यंत्र उभारणीच्या कामासाठी शासन स्तरावरुन कलम १२(१) ची सर्वसमावेशक मंजुरी (Blanket Permission) देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

राज्यातील ३१ बाजार समित्यांमध्ये आवक होणाऱ्या धान्यवर्गीय शेतीमालाची स्वच्छता व प्रतवारी होण्यासाठी प्रत्येकी ०१ या प्रमाणे नवीन ३१ धान्य चाळणी यंत्र उभारणी कामाकरीता महाराष्ट्र कृषि उत्पन्न पणन (प्रचालन व सुविधा) अधिनियम १९६३ मधील कलम ५९ मधील शासनास प्राप्त अधिकाराचा वापर करुन अधिनियमातील कलम १२(१) ची सर्वसमावेशक मंजूरी (Blanket Permission) या शासन निर्णयाद्वारे देण्यात येत आहे. त्यामुळे पणन संचालक, महाराष्ट्र राज्य यांचेकडून कलम १२(१) ची स्वतंत्र मंजूरी घेण्याची आवश्यकता राहणार नाही

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२१९१५४०१२११०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant
Baliram Bhoir

Digitally signed by Jayant Baliram Bhoir
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Cooperation, Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=33a892413bd2c105002f2acc67792c5931afb42987d31b0deb6c0181d19c74aa, serialNumber=33432a8e2e81dcab0518d2a6ca4f4f1d3dba7ca3247657527f52bef2a2aa29b2, cn=Jayant Baliram Bhoir
Date: 2018.12.19 15:47:54 +05'30'

**( जयंत भोईर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
२. मा.मंत्री (सहकार,पणन व वस्त्रोद्योग), मंत्रालय, मुंबई
३. मा . राज्यमंत्री (पणन), मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव ( पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
५. उप सचिव ( पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
६. उप सचिव ( रा.कृ.वि.यो), कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई
८. महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर
९. अवर सचिव, रा.कृ.वि.यो.कक्ष, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
११.पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२.अवर सचिव/ कक्ष अधिकारी (१७-स),सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवडनस्ती.